उच्च शिक्षण संचालनालय व संचालनालयाच्या अधिनस्त शासकीय कार्यालये/ शासकीय महाविद्यालये/ संस्थांमधील अस्थायी पदे दिनांक ३१.०८.२०२३ पर्यंत चालू ठेवण्यास मान्यता देणेबाबत...

महाराष्ट्र शासन

उच्च व तंत्र शिक्षण विभाग

**शासन निर्णय क्र. मुवाढ-२०२१/ प्र.क्र.१९२/ मशि-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक:- ०२ मार्च, २०२३

वाचाः- (१) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. मुवाढ-२०२१/प्र.क्र.१९२/मशि-१, दिनांक १४.०९.२०२२.

(२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि. ०८.०२.२०२३

(३) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. उशिसं/अस्थायी पदे मुदतवाढ/प्रशा-२/१८९६, दिनांक २१.०२.२०२३.

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन क्रमांक १ येथील दिनांक १४.०९.२०२२ च्या शासन निर्णयान्वये, उच्च शिक्षण संचालनालयाच्या आस्थापनेवरील १६५६ पुर्णवेळ व ०७ अर्धवेळ अस्थायी पदे दिनांक ०१.०९.२०२२ ते दिनांक २८.०२.२०२३ पर्यंत चालू ठेवण्यास मंजुरी देण्यात आली आहे. संदर्भाधीन क्रमांक २ येथील वित्त विभागाच्या दिनांक ०८.०२.२०२३ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच, यापुर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु, ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तीत्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२३ ते दिनांक ३१.०८.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भाधीन क्रमांक ३ येथील पत्रान्वये उच्च शिक्षण संचालनालयाच्या आस्थापनेवरील १६५६ पुर्णवेळ व ०७ अर्धवेळ अस्थायी पदे दिनांक ०१.०३.२०२३ ते दिनांक ३१.०८.२०२३ पर्यंत चालू ठेवण्यासाठी मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव सादर केला आहे. त्यानुसार सदर अस्थायी पदे दिनांक ३१.०८.२०२३ पर्यंत चालू ठेवण्यास मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भाधीन क्रमांक ३ येथील पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार, उच्च शिक्षण संचालनालय व त्यांच्या अधिनस्त शासकीय कार्यालये/ शासकीय महाविद्यालये/संस्था/ शासकीय अध्यापक महाविद्यालये/ आर्थिकदृष्ट्या मागासवर्गीय वसतिगृहे/ भारतीय प्रशासकीय सेवा पुर्व प्रशिक्षण केंद्रे/ सावित्रीदेवी फुले महिला छात्रालय, तेलंग स्मारक मुलींचे वसतिगृहे/ शासकीय महाविद्यालय वसतिगृहे/ डॉ. बाबासाहेब आंबेडकर, महात्मा ज्योतीराव फुले व राजर्षी शाहू महाराज चरित्र साधने प्रकाशन समिती, मुंबई यामधील खाली दर्शविलेली १६५६ पुर्णवेळ व ०७ अर्धवेळ अस्थायी पदे दिनांक ०१.०३.२०२३ ते दिनांक ३१.०८.२०२३ पर्यंत चालू ठेवण्यास यान्वये शासन मंजुरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | एकूण पदे | |
|---|---|---|---|
| | | पूर्णवेळ | अर्धवेळ |
| १ | उच्च शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे | ७७ | ० |
| २ | सहसंचालक, उच्च शिक्षण, मुंबई विभाग, मुंबई | ५१४ | ७ |
| ३ | सहसंचालक, उच्च शिक्षण, कोकण विभाग, पनवेल | ६३ | ० |
| ४ | सहसंचालक, उच्च शिक्षण, पुणे विभाग, पुणे | ४६ | ० |
| ५ | सहसंचालक, उच्च शिक्षण, कोल्हापूर विभाग,कोल्हापूर | १०५ | ० |
| ६ | सहसंचालक, उच्च शिक्षण, सोलापूर विभाग, सोलापूर | २९ | ० |
| ७ | सहसंचालक, उच्च शिक्षण, जळगाव विभाग, जळगाव | ३७ | ० |
| ८ | सहसंचालक, उच्च शिक्षण, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद | २४० | ० |
| ९ | सहसंचालक, उच्च शिक्षण, नांदेड विभाग, नांदेड | ७२ | ० |
| १० | सहसंचालक, उच्च शिक्षण, अमरावती विभाग, अमरावती | २४१ | ० |
| ११ | सहसंचालक, उच्च शिक्षण, नागपूर विभाग, नागपूर | २३२ | ० |
| **एकूण** | | **१६५६** | **७** |

२. वित्त विभागाच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन व्यपगत झालेल्या कोणत्याही अस्थायी पदांना मुदतवाढ दिली जाणार नाही, याची दक्षता संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांनी घ्यावी.

३. उच्च शिक्षण संचालनालय व त्यांच्या अधिनस्त शासकीय कार्यालये/ शासकीय महाविद्यालये/ संस्था / शासकीय अध्यापक महाविद्यालये/ आर्थिकदृष्ट्या मागासवर्गीय वसतिगृहे/ भारतीय प्रशासकीय सेवा पुर्व प्रशिक्षण केंद्रे/ सावित्रीदेवी फुले महिला छात्रालय, तेलंग स्मारक मुलींचे वसतिगृहे/ शासकीय महाविद्यालय वसतिगृहे यामधील अस्थायी पदांवर होणारा खर्च २२०२- सर्वसाधारण शिक्षण या प्रधान लेखाशीर्षाखाली, तसेच डॉ. बाबासाहेब आंबेडकर, महात्मा ज्योतीराव फुले व राजर्षी शाहू महाराज चरित्र साधने प्रकाशन समिती यामधील पदांवर होणारा खर्च मागणी क्र.डब्ल्यु-४, २२०५- कला व संस्कृती, ८००- इतर खर्च, (०१)-समित्या व समारंभ, (०१)(०१) समित्या व समारंभ (अनिवार्य) (२२०५ ०४५८) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र. ०८/१६/आ.पु.क., दि.०८.०२.२०२३ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना देण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०३०२१३०९२६०५०८ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRATAP PANDURANG LUBAL

Digitally signed by PRATAP PANDURANG LUBAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=b0d6763338fc6cc4f7cf07ca60db7abc1cfac99c84ab1b5bfc0dae4609d631d0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AF6895C47A84066432F5BDD1F182B4163D880AC9BD8D24A198FD0E7310BBEB59, cn=PRATAP PANDURANG LUBAL
Date: 2023.03.02 13:13:55 +05'30'

**( प्रताप पां. लुबाळ )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
४. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), मुंबई/ नागपूर

५. लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई
६. निवासी लेखाधिकारी, मुंबई
७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे, सोलापूर, कोल्हापूर, औरंगाबाद, नांदेड, परभणी, बीड, अमरावती, अकोला, बुलढाणा, यवतमाळ, नागपूर, भंडारा, गडचिरोली, रत्नागिरी व रायगड
८. सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण
९. प्राचार्य/ संचालक, सर्व शासकीय कला, वाणिज्य, विज्ञान, विधी व शिक्षणशास्त्र महाविद्यालये/संस्था
१०. संचालक, सर्व भारतीय प्रशासकीय सेवा पुर्व प्रशिक्षण केंद्रे
११. वसतिगृह प्रमुख, सर्व शासकीय आर्थिकदृष्ट्या मागासवर्गीय वसतिगृहे.
१२. अधिक्षक, शासकीय महाविद्यालये वसतिगृहे, मुंबई
१३. अधिक्षक, सावित्रीदेवी फुले महिला छात्रालय, मुंबई
१४. अधिक्षक, तेलंग स्मारक मुलींचे वसतिगृहे, मुंबई
१५. सदस्य सचिव, डॉ. बाबासाहेब आंबेडकर, महात्मा ज्योतीराव फुले व राजर्षी शाहू महाराज चरित्र साधने प्रकाशन समिती, मुंबई
१६. वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई.
१७. निवड नस्ती (मशि-१).